राज्यात माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१९ मध्ये झालेल्या "क्यार" व "महा" चक्रिवादळामुळे झालेल्या अवेळी पावसामुळे शेतीपिकाच्या नुकसानीपोटी आपद्ग्रस्तांना विशेष दराने मदत देण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत (कोकण विभाग)

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक- पूरक २०१९/प्र.क्र.१९८/म-३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १७ ऑगस्ट, २०२०

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस -२०१५/प्र.क्र.४०/म-३, दिनांक १३.०५.२०१५
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस -२०१९/प्र.क्र.१९१/म-३, दिनांक १८/११/२०१९
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस -२०१९/प्र.क्र.१९१/म-३, दिनांक १३/१२/२०१९
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. पूरक -२०१९/प्र.क्र.१९८/म-३, दि. ०१/०२/२०२०.
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. पूरक -२०१९/प्र.क्र.१९८/म-३, दि. २९/०६/२०२०.
६) विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांचे पत्र क्रमांक-मशा/नै. आ./कार्या-६/कावि-१२१५७/ २०२०, दि. ०१/०७/२०२०.

**<u>प्रस्तावना:-</u>**

राज्यात माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१९ मध्ये "क्यार" व "महा" चक्रिवादळामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे झालेल्या अवेळी पावसामुळे राज्यातील ३४ जिल्ह्यातील ३४९ तालुक्यांमधील शेतीपिकांचे नुकसान झाल्याचे निदर्शनास आले आहे. सदर नैसर्गिक आपत्तीमुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्याने बाधित झालेल्या शेतकऱ्यांना मदतीसाठी संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या दराने मदत देण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक २,३,४ येथील शासन निर्णयान्वये एकूण रूपये १३१३०.९८ लक्ष इतका निधी कोकण विभागीय आयुक्त यांना वितरीत करण्यात आलेला आहे. कोकण विभागीय आयुक्त यांचेकडून सदर वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आलेले असून त्यांनी उर्वरित बाधित शेतक-यांना निधी वाटप करण्यासाठी संदर्भाधीन क्र. ६ येथील पत्रान्वये रू. ८,८८,५३,४८३/- इतक्या अतिरिक्त निधीची मागणी केलेली आहे. या प्रयोजनासाठी उर्वरित बाधित शेतक-यांना मदतीचे वाटप करण्यासाठी रूपये ८,८८,५४,००० /- (रूपये आठ कोटी अठ्ठ्याऐंशी लक्ष चौप्पन्न हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१९ मध्ये "क्यार" व "महा" चक्रिवादळामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे झालेल्या अवेळी पावसामुळे राज्यातील ३४ जिल्ह्यांतील ३४९ तालुक्यांमधील

शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान झाले आहे. सदर आपत्तीमुळे शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान झालेल्या आपद्ग्रस्त शेतकऱ्यांना पुढीलप्रमाणे विशेष दराने मदत देण्याचा निर्णय शासनाने संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे.

**मदत - शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान**

| बाब | आर्थिक सहाय्याचे दर |
|---|---|
| अ) शेतीपिके | रु.८,०००/- प्रति हे. |
| ब) बहुवार्षिक पिके (फळबागा) | रु.१८,०००/- प्रति हे. |

शेतीपिके/ फळपिकांच्या नुकसानीसाठी २ हेक्टरच्या मर्यादेपर्यंत उपरोक्त मदत अनुज्ञेय राहील.

२. उपरोक्त दरानुसार उर्वरित बाधित शेतक-यांना मदतीचे वाटप करण्यासाठी रूपये ८,८८,५४,००० /- (रूपये आठ कोटी अठ्ठ्याऐंशी लक्ष चौप्पन्न हजार फक्त) इतका निधी पुढीलप्रमाणे जिल्हांना विभागीय आयुक्त कोकण मार्फत वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | वितरीत करण्यात येत असलेला निधी (रू. लाखात) |
|---|---|---|
| १ | ठाणे | १००.०० |
| २ | पालघर | ३७९.११ |
| ३ | रायगड | २९८.४३ |
| ४ | सिंधुदुर्ग | १११.०० |
| | **एकूण** | **८८८.५४** |

**३.** शेती व बहुवार्षिक पिकाच्या नुकसानीसाठी मदतीचे वाटप करताना खालीलप्रमाणे दक्षता घेण्यात यावी.

i) प्रचलित नियमानुसार शेती / बहुवार्षिक फळपिकाच्या नुकसानीकरीता मदत ३३ टक्के अथवा त्याहून अधिक नुकसान झालेल्यांना अनुज्ञेय राहील.

ii) प्रचलित पध्दतीनुसार कृषी सहायक, तलाठी व ग्राम सेवक यांच्या संयुक्त स्वाक्षरीने पूर्ण करण्यात आलेल्या पंचनाम्यानुसार सर्व जिल्हाधिकारी यांनी दिलेल्या अहवालानुसार विभागीय आयुक्त यांनी शासनास सादर करण्यात आलेल्या अहवालानुसार मदतीचे वाटप जिल्हाधिकारी यांनी करावे.

iii) शेतीपिकांच्या नुकसानीसाठी मदतीची किमान रक्कम रू. १,०००/- तसेच बहुवार्षिक पिकांसाठी मदतीची किमान रक्कम रूपये २,०००/- अनुज्ञेय राहील.

ivi) संबंधित बाधितांच्या बँक बचत खात्यात मदतीची रक्कम थेट जमा करण्यात यावी.

v) कोणत्याही बाधितांना रोखीने किंवा निविष्ठा स्वरुपात मदत करण्यात येऊ नये.

vi) शेत जमिनीच्या झालेल्या नुकसानीकरीता मदतीची रक्कम खातेदारांच्या बँक खात्यावर थेट जमा करताना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करु नये. याकरिता सहकार विभागाने योग्य ते आदेश निर्गमित करावेत.

vii) सदर निर्णयान्वये शेतकऱ्यांना देण्यात येणारी मदत ही विशेष बाब असल्यामुळे पूर्वोदाहरण म्हणून गणली जाणार नाही.

**४.** उपरोक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशीर्ष २२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य, ०२, पूर, चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०५) नैसर्गिक आपत्तीमुळे पीक नुकसानीकरिता शेतकऱ्यांना मदत, ३१ सहाय्यक अनुदाने ( २२४५ २४५२) या लेखाशीर्षाखाली चालू वर्षी करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून खर्ची टाकण्यात यावा. सदर निधी विभागीय आयुक्त यांना अर्थसंकल्पीय प्रणालीवर वितरीत करण्याची कार्यवाही कार्यासन म-११, मदत व पुनर्वसन प्रभाग यांनी करावी.

५. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक:१७२/२०२०/व्यय-९, दिनांक १०/०८/२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१७१५०५२२६३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.08.17 16:00:50 +05'30'

**( सुभाष उमराणीकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. विभागीय आयुक्त कोकण
३. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
४. जिल्हाधिकारी, ठाणे/पालघर/रायगड/सिंधुदुर्ग
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
६. महालेखापाल (लेखा परीक्षण), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी ठाणे/पालघर/रायगड/सिंधुदुर्ग
९. सह सचिव व वित्तीय सल्लागार (कार्यासन म-११), मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय,मुंबई यांना बीम्स प्रणालीवर निधी वितरित करण्याच्या विनंतीसह अग्रेषित
१०.कार्यासन अधिकारी, कार्यासन म-११, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय,मुंबई
११.कार्यासन अधिकारी , कार्यासन( अर्थसंकल्प-६/व्यय-९) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१२.कार्यासन अधिकारी, कार्यासन (१०-अे/१३-अे), कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.निवडनस्ती म-३ कार्यासन